सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात चंद्रपूर सैनिक शाळेला योजनेतर (वेतनेतर) अनुदानासाठी निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चंसैशा-२०२०/प्र.क्र.३२/२०/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: १० नोव्हेंबर, २०२०

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.०४.२०२०
२) प्राचार्य, चंद्रपूर सैनिक शाळा यांचे पत्र क्र. एसएससीएन/१६१३/Accts./१९-२०/०१, दि. ५ जून,२०२०

**प्रस्तावना :-**

दिनांक ०९.०४.२०१५ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत चंद्रपूर येथे सातारा सैनिक शाळेच्या धर्तीवर नवीन सैनिक शाळा सुरु करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. चंद्रपूर जिल्ह्यात चंद्रपूर- बल्लारपूर या मुख्य महामार्गावर भिवकुंड येथे सदर नवीन सैनिकी शाळा सुरु करण्यात आली आहे. प्रस्तुत सैनिकी शाळेच्या विविध बांधकामांसाठी सुमारे ५६१.७७ कोटी इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून त्यासाठी अद्यापपावेतो सुमारे ५३५ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. चंद्रपूर सैनिक शाळेबाबत केंद्र सरकार(केंद्रीय संरक्षण मंत्रालय) व राज्य शासन यांच्यामध्ये दि. १५ जुन २०१६ रोजी सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर सामंजस्य करारातील तरतुदींनुसार प्रस्तुत सैनिक शाळेसाठी प्रतिवर्षी एनपीएस अंशदान, प्रशिक्षण व व्यवस्थापकीय खर्च, आहारभत्ता, शिष्यवृत्ती, जाहिरात खर्च, इमारत देखभाल, नगरपालिका कर, या प्रयोजनार्थ येणा-या आर्थिकभाराची जबाबदारी राज्य शासनाची आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी २२०२०४६९ या लेखाशिर्षांतर्गत रु. ६,५६,८५,०००/-इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर निधीच्या ५०% इतक्या मर्यादेत म्हणजेच रु. ३,२८,४२,५००/- इतका निधी वित्त विभागाने मंजूर केला असून त्यापैकी २५% निधी म्हणजेच रु. १६४,२१,२५०/- इतका निधी यापूर्वीच सातारा सैनिकी शाळेस दि. २५.०८.२०२० च्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार उर्वरीत २५% म्हणजेच रु. १,६४,२१,२५०/- निधी पैकी प्रत्येकी १२.५% या मर्यादेत चंद्रपूर सैनिकी शाळेसाठी व सातारा सैनिकी शाळेसाठी प्रत्येकी रु.८२,१०,६२५/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर सैनिकी स्कूल व सातारा सैनिकी स्कूल साठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु.६,५६,८५,०००/- या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून यापूर्वी सातारा सैनिकी स्कूल साठी रु.१,६४,२१,२५०/-इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार आता मंजूर तरतूदीच्या ५०% इतक्या मर्यादेत म्हणजेच रु.३,२८,४२,५००/- इतक्या निधीपैकी ५०% या प्रमाणात म्हणजेच रु.१,६४,२१,२५०/- इतक्या निधीपैकी ५०% निधी म्हणजेच रु. ८२,१०,६२५/- (रुपये ब्याऐंशी लाख दहा हजार सहाशे पंचवीस फक्त) इतका निधी चंद्रपूर सैनिकी स्कूल साठी वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च “मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०७/प्र. क्र. ७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र. ९४/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४५२/२०२०/व्यय-५, दिनांक ०९/१०/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११०११२९४५३२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6,
serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.11.10 11:32:44 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
४. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
७. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, चंद्रपूर
८. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
९. प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
११. वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१२. प्राचार्य, सैनिकी स्कूल, चंद्रपूर
१३. सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१४. मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१७. निवड नस्ती (एसएम-६)